**पोलीस उप महानिरीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, पुणे हे पद बृहन्मुंबई येथे स्थलांतरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयपीएस-१७१६/प्र.क्र.४५०/पोल-१**
गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मुंबई-४०००३२.
दिनांक: - ७ मार्च, २०१७

वाचा:- गृह विभाग, शासन निर्णय, क्र. आयएसए-१०/०३/१५/विशा-४, दिनांक ०८.०७.२००४

प्रस्तावना:-

राज्यात दहशतवादी कारवायांना प्रभावीपणे आळा घालण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्यासाठी दहशतवाद विरोधी पथकाची स्थापना करण्यात आली आहे. या पथकाकडे दहशतवादी हालचालीबाबत माहिती घेणे व त्याविरुध्द कारवाई करणे. तसेच माफिया, संघटित गुन्हेगार, हवाला रॅकेट चालविणाऱ्या व्यक्ती यांचा व देशविघातक व्यक्तींबरोबर संबध आहेत अशा व्यक्तींच्या हालचालीवर लक्ष ठेवणे . तसेच त्यांचे कडे बनावट चलनी नोटा, अत्याधुनिक अग्नीशस्त्रे, स्फोटके आणि मादक द्रव्याची तस्करी उघडकीस आणणे इत्यादी कामे सोपविण्यात आलेली आहेत.

२. दहशतवाद विरोधी पथकाचे प्रमुख म्हणून संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विशेष पोलीस महानिरीक्षक दर्जाच्या अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात आली. कालातंराने सदर पदाची श्रेणी उन्नत करुन अपर पोलीस महासंचालक दर्जाचे अधिकारी सध्या दहशतवाद विरोधी पथकाचे प्रमुख म्हणून कार्यरत आहेत. तर विशेष पोलीस महानिरीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, मुंबई व पोलीस उप महानिरीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, पुणे ही २ पर्यवेक्षकीय पदे अस्तित्वात आहेत.

३. दहशतवादी संघटनाच्या वाढलेल्या कारवायांमुळे दहशतवाद विरोधी पथकाच्या कामकाजाचे स्वरुप बदलले आहे. गुन्हयाच्या तपासाचे पर्यवेक्षण, इतर दहशतवाद विरोधी काम करणा-या संघटना / गुप्तचर यंत्रणा यांच्याशी समन्वय तसेच दिल्ली येथील समन्वय बैठका या गोष्टी पोलीस उप महानिरीक्षक / विशेष पोलीस महानिरीक्षक या स्तरावर मुंबई येथून करणे परिणामकारक ठरणार असल्याने पोलीस उप महानिरीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, पुणे हे पद बृहन्मुंबई येथे स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय -**

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे दहशतवादी संघटनाच्या वाढलेल्या कारवाया, गुन्हयाच्या तपासाचे पर्यवेक्षण, इतर दहशतवाद विरोधी काम करणा-या संघटना / गुप्तचर यंत्रणा यांच्याशी समन्वय तसेच दिल्ली येथील समन्वय बैठका या गोष्टी पोलीस उप महानिरीक्षक / विशेष पोलीस महानिरीक्षक

यांचे स्तरावर मुंबई येथून करणे परिणामकारक ठरणार असल्याने संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेल्या दहशतवाद विरोधी पथकातील पोलीस उप महानिरीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, पुणे हे पद बृहन्मुंबई येथे स्थलांतरीत करण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक ०२.०६.२०१५ मधील परिच्छेद क्र.४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन पोलीस उप महानिरीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, पुणे हे पद मुंबई येथे स्थानांतरीत करण्यात येत आहे. स्थानांतरीत करण्यात आलेले सदर पद अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, म.रा., मुंबई यांच्या अधिपत्याखाली कार्यरत राहील.

३. तसेच, स्थानांतरीत करण्यात आलेल्या सदर पोलीस उप महानिरीक्षक या पदाचे वेतन व भत्ते अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, म.रा., मुंबई यांच्या कार्यालयास त्या-त्या आर्थिक वर्षात उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत-स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११०१२१४२५१८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas A. Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2017.03.07 12:35:46 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे/ ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ / २, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
४. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. अ.मु.स.(गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. पोलीस आयुक्त, मुंबई.

८. प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११.पोलीस आयुक्त, नवी मुंबई, पुणे, नाशिक, सोलापूर, अमरावती, नागपूर.
१२.विशेष पोलीस महानिरीक्षक, कोकण/ पुणे / नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/नागपूर परिक्षेत्र.
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४.निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१५. सह सचिव/ उप सचिव (सर्व), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.सहाय्यक संचालक, भापोसे कक्ष, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती, पोल-१